**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी-१५२१/प्र.क्र.४८/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १५ मार्च, २०२२

**संदर्भ** - १) सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश क्र.एएससी-१५२१/प्र.क्र.४८/१४-अ, दिनांक ३० ऑगस्ट, २०२१ व दिनांक ३० सप्टेंबर, २०२१.

**-शासन आदेश-**

मंत्रालयीन विभागातील लिपिक-टंकलेखकांना संदर्भाधिन दिनांक ३० ऑगस्ट, २०२१ च्या व दिनांक ३० सप्टेंबर, २०२१ च्या आदेशान्वये सहायक कक्ष अधिकारी पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली होती. श्री.अ.शं.सानप, श्री. मा.मा.फड, श्री.अ.दि.घुटे व श्री. कृ.ग.वसईकर लिपिक-टंकलेखक हे प्रतिनियुक्तीवर कार्यरत असल्याने संदर्भाधिन दिनांक ३० ऑगस्ट २०२१ व दिनांक ३० सप्टेंबर, २०२१ च्या आदेशान्वये त्यांना आदेशांच्या दिनांकापासून ६ महिन्यांच्या कालावधीकरीता सहायक कक्ष अधिकारी पदावर ते कार्यरत असलेल्या कार्यालयात प्रपत्र बढती देण्यात आली. श्री.अ.शं.सानप, श्री. मा.मा.फड, श्री.अ.दि.घुटे यांचा प्रपत्र बढतीचा कालावधी दिनांक २८-०२-२०२२ रोजी संपुष्टात आलेला आहे. श्री.कृ.ग.वसईकर यांचा प्रपत्र बढतीचा कालावधी दिनांक २९-०३-२०२२ रोजी संपुष्टात येत आहे.

२. या आदेशान्वये श्री.अ.शं.सानप, श्री. मा.मा.फड, श्री.अ.दि.घुटे व श्री. कृ.ग.वसईकर यांच्या प्रपत्र बढतीस पुढीलप्रमाणे मुदतवाढ देण्यात येत आहे:-

२.१ श्री. अ.शं.सानप, यांची सहायक कक्ष अधिकारी पदावर प्रपत्र बढतीने नियुक्ती मा. राज्यमंत्री, सहकार, कृषि, सामाजिक न्याय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण अल्पसंख्याक विकास व औकाफ, मराठी भाषा यांच्या कार्यालयात दिनांक ३० ऑगस्ट, २०२१ पासून पुढील ६ महिन्यांकरीता करण्यात आलेली आहे. श्री. सानप यांच्या प्रपत्र बढतीस डॉ.विश्वजित कदम, मा. राज्यमंत्री यांच्या मंत्री पदाचा कार्यकाळ असेपर्यंत अथवा सध्याच्या मंत्रीमंडळाच्या कालावधीपर्यंत यापैकी जे प्रथम लागू होईल ते, या कालावधीकरीता प्रपत्र बढतीस मुदतवाढ देण्यात येत आहे.

२.२ श्री.मा.मा.फड, यांची सहायक कक्ष अधिकारी पदावर प्रपत्र बढतीने नियुक्ती मा. मंत्री, सहकार, पणन यांच्या कार्यालयात दिनांक ३० ऑगस्ट, २०२१ पासून पुढील ६ महिन्यांकरीता करण्यात आलेली आहे. श्री. फड यांच्या प्रपत्र बढतीस मा. मंत्री, श्री. बाळासाहेब पाटील यांच्या मंत्री पदाचा कार्यकाळ असेपर्यंत अथवा सध्याच्या मंत्रीमंडळाच्या कालावधीपर्यंत यापैकी जे प्रथम लागू होईल ते, या कालावधीकरीता प्रपत्र बढतीस मुदतवाढ देण्यात येत आहे.

२.३ श्री.अ.दि.घुटे व श्री. कृ.ग.वसईकर यांची सहायक कक्ष अधिकारी पदावर प्रपत्र बढतीने नियुक्ती मा. उप मुख्यमंत्री यांच्या कार्यालयात अनुक्रमे दिनांक ३० ऑगस्ट, २०२१ व दिनांक ३० सप्टेंबर, २०२१ पासून पुढील ६ महिन्यांकरीता करण्यात आलेली आहे. श्री. अ.दि.घुटे व श्री. कृ.ग.वसईकर यांच्या प्रपत्र बढतीस मा. उप मुख्यमंत्री, श्री. अजित पवार यांच्या उप मुख्यमंत्री पदाचा कार्यकाळ असेपर्यंत अथवा सध्याच्या मंत्रीमंडळाच्या कालावधीपर्यंत यापैकी जे प्रथम लागू होईल ते, या कालावधीकरीता प्रपत्र बढतीस मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. त्यानंतर उपरोक्त सहायक कक्ष अधिकारी यांनी त्यांच्या पुर्वीच्या विभागातील सहायक कक्ष अधिकारी पदावर हजर होणे आवश्यक आहे.

४. पदोन्नतीबाबतच्या अन्य अटी व शर्ती संदर्भाधिन आदेशात नमूद केल्याप्रमाणे राहतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३१५११५७५६०४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

GAJANAN BHIMRAO GURAV

Digitally signed by GAJANAN BHIMRAO GURAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=54B11B1CCBDC577D71DCE3B313C3FEF5DC2AD659E360F73B682D6B6FCCB8AECF, cn=GAJANAN BHIMRAO GURAV
Date: 2022.03.15 12:01:26 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. श्री.अ.शं.सानप, सहायक कक्ष अधिकारी, मा. राज्यमंत्री, सहकार, कृषि, सामाजिक न्याय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण अल्पसंख्याक विकास व औकाफ, मराठी भाषा यांच्या कार्यालयामार्फत.
२. श्री.मा.मा.फड, सहायक कक्ष अधिकारी, मा. मंत्री, सहकार, पणन यांच्या कार्यालयामार्फत.
३. श्री.अ.दि.घुटे,सहायक कक्ष अधिकारी, मा. उप मुख्यमंत्री यांच्या कार्यालयामार्फत.
४. श्री.कृ.ग.वसईकर, सहायक कक्ष अधिकारी, मा. उप मुख्यमंत्री यांच्या कार्यालयामार्फत.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग/कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग/ विधि व न्याय विभाग/मृद व जलसंधारण विभाग मंत्रालय, मुंबई. (संबंधित मंत्रालयीन विभागांमार्फत)
उप सचिव, मा. उप मुख्यमंत्री यांचे कार्यालय
२. खाजगी सचिव, मा. मंत्री, सहकार, पणन यांचे कार्यालय
३. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, सहकार, कृषि, सामाजिक न्याय, अन्न, नागरी पुरवठा
४. व ग्राहक संरक्षण, अल्पसंख्याक विकास व औकाफ, मराठी भाषा यांचे कार्यालय
५. सह सचिव (आस्थापना), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग/कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग/ विधि व न्याय विभाग/मृद व जलसंधारण विभाग मंत्रालय, मुंबई. (संबंधित मंत्रालयीन विभागांमार्फत)
६. कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.१४,१४-अ, १४-ब.
७. निवड नस्ती/संग्रहार्थ (कार्यासन १४-अ).